जिल्हा नियोजन समिती सांगलीच्या कार्यकारी समितीवर विशेष निमंत्रित सदस्यांची नियुक्ती करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**नियोजन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: डिएपी-२०२१/प्र.क्र.२५/का-१४८१- अ**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक : ०८ ऑक्टोबर, २०२१.

**पहा:-** १) महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (रचना व कामे) अधिनियम, १९९८,

२) महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (रचना व कामे) (सुधारणा) अधिनियम, २०००

३) शासन निर्णय क्रमांक: डिएपी -२०२१/प्र.क्र.२५/का-१४८१-अ, दि. ०६.०८.२०२१

४) मा.पालकमंत्री, सांगली तथा मंत्री, जलसंपदा व लाभक्षेत्र विकास यांचे पत्र, क्र.मंत्री/जसंवलाक्षेवि/vip/क्र.१३०९४, दि.०२.०९.२०२१

**शासन निर्णय :-**

"महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (सभा घेणे) (सुधारणा) नियम,२०१८" मधील "नियम ६-अ" च्या तरतुदीनुसार व महाराष्ट्र जिल्हा नियोजन समिती (रचना व कामे) अधिनियम,१९९८ च्या कलम ३ (३) च्या परिच्छेद दोन अन्वये एकूण "नामनिर्देशित सदस्य" आणि कलम ३ (३) च्या परिच्छेद चार (अ) व (फ) नुसार एकूण "विशेष निमंत्रित" सदस्य यांचेपैकी, जिल्हा नियोजन समिती, सांगली चे अध्यक्ष तथा पालकमंत्री यांनी शिफारस केल्यानुसार सांगली जिल्हयातील सन्माननीय आमदार यांच्या नामनिर्देशनासह जिल्हा नियोजन समिती सांगलीची "कार्यकारी समिती" उपरोल्लेखित शासन निर्णय क्र.३ अन्वये घटित करण्यात आली होती.

२. मा. पालकमंत्री, **सांगली** तथा मंत्री, जलसंपदा व लाभक्षेत्र विकास यांच्या उपरोल्लेखित क्र.४ च्या पत्रान्वये शिफारस केल्यानुसार खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे कार्यकारी समितीवरील खालील **"विशेष निमंत्रित सदस्याची" नियुक्ती रद्द** करण्यात येत असून त्यांचे जागी **नवीन विशेष निमंत्रित सदस्याची नियुक्ती** करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| नियुक्ती रद्द करण्यात येत असलेले विशेष निमंत्रित सदस्य | | | नवनियुक्त विशेष निमंत्रित सदस्य | |
|---|---|---|---|---|
| **अ.क्र** | **सदस्याचे नाव** | **पत्ता** | **सदस्याचे नाव** | **पत्ता** |
| १ | श्री.देवराज जनार्दन पाटील | रा.कासेगांव, ता.वाळवा, जि.सांगली | श्री. अनिल बाबर, विधानसभा सदस्य | खानापूर, जि.सांगली |

२. जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, सांगली यांनी उपरोक्त आदेश सर्व संबंधितांच्या निदर्शनास आणावेत.

३. सांगली जिल्हा नियोजन समितीसाठी कार्यकारी समितीवर वरील नमूद विशेष निमंत्रित सदस्याची करण्यात आलेली नियुक्ती पुढील आदेश होईपर्यंत किंवा शासनाकडून सदर नियुक्ती रद्द होईपर्यंत या पैकी जे अगोदर घडेल, तोपर्यंत अबाधित राहतील.

४. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२११००८१५५४२५२५१६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Digitally signed by Sanjeev Harishchandra Dhuri
Date: 2021.10.08 15:55:11 +05'30'

**( संजीव ह. धुरी )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.

२. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव,मंत्रालय, मुंबई.

३. मा. उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई.

४. मा. पालकमंत्री तथा अध्यक्ष, जिल्हा नियोजन समिती, सांगली यांचे खाजगी सचिव.

५. मा. कार्यकारी अध्यक्ष, राज्य नियोजन मंडळ, महाराष्ट्र, मंत्रालय, मुंबई

६. मा. राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

६. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

७. विभागीय आयुक्त, पुणे विभाग पुणे

८. जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती,सांगली

९. उप आयुक्त (नियोजन), विभागीय आयुक्तांचे कार्यालय, पुणे विभाग पुणे

१०. जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, सांगली

११. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,

१२. कोषागार अधिकारी, सांगली

१३. श्री.देवराज जनार्दन पाटील, (जिल्हाधिकारी, सांगली यांचेमार्फत)

१४. श्री.अनिल बाबर, विधानसभा सदस्य (जिल्हाधिकारी, सांगली यांचेमार्फत)

१५. निवड नस्ती, का-१४८१-अ, नियोजन विभाग.